**भूसंपादन अधिनियम, १८९४ मधील कलम १८ खालील भूसंपादन संदर्भांमध्ये सरकारी वकिलांना सहाय्य करण्यासाठी निर्माण केलेल्या मुल्यांकन तज्ञांच्या १४ पथकातील ३८ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२४ च्या पुढे मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: अपमु-२०२३/प्र.क्र.२५०/अ-२**

(E-Office No.६७३४६६)

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: ०८.०५.२०२४

**वाचा:-** १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.एलक्यूएन ३१७१/क्यू, दि.०४.०८.१९७२

२) शासन निर्णय, क्रमांक- एलक्यूएन-०४/२०१५/प्र.क्र.४२/अ-२, दि.०९.१०.२०२३

३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१.०२.२०२४

**प्रस्तावना :-**

वित्त विभागाच्या दि.२१.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयाने दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ या कालावधी करीता अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत प्रशासकीय विभागांना अधिकार प्रदान करणेबाबत मान्यता देण्यात आली आहे.

सर्व विभागीय आयुक्त यांनी त्यांचे पत्रानुसार त्यांच्या अधिनस्त असलेल्या भूसंपादन संदर्भांमध्ये सरकारी वकिलांना सहाय्य करण्यासाठी निर्माण केलेल्या मुल्यांकन तज्ञांच्या १४ पथकातील ३८ अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत विनंती केली आहे. यापूर्वी दि.०१.०९.२०२३ ते दि.२९.०२.२०२४ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ प्रदान करण्यात आलेली आहे. त्याच धर्तीवर कार्यरत पदांचा आकृतीबंध निश्चित झालेला नसल्यामुळे वित्त विभागाने प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून सर्व विभागीय आयुक्त यांचे अधिनस्त भूसंपादन संदर्भांमध्ये सरकारी वकिलांना सहाय्य करण्यासाठी निर्माण केलेल्या मुल्यांकन तज्ञांच्या १४ पथकातील ३८ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णय क्र.२ अन्वये भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम १८ खाली वाढीव मोबदला मिळण्यासाठी मा.न्यायालयामध्ये दाखल केलेल्या भूसंपादन संदर्भांमध्ये निवाडयांची छाननी करून मूल्यांकन तज्ञ म्हणून सरकारी वकिलांना जमीन मूल्यांकनाबाबत योग्य ते साहाय्य करण्यासाठी नगररचना व मूल्यनिर्धारण विभागातील नगर रचनाकारांची १४ पथके तात्पुरत्या स्वरुपात दि.०१.०९.२०२३ ते दि.२९.०२.२०२४ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात आलेली होती.

२. आता, उपरोक्त १४ पथकांतील एकूण ३८ अस्थायी योजनेतर पदे दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाची मंजुरी देण्यात येत आहे. सोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये

दर्शविल्याप्रमाणे उपरोक्त एकूण ३८ पदांना दिनांक ३१.०८.२०२४ पर्यंत खालील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे:-

१) निरनिराळया विभागांनी अतिरिक्त म्हणून जाहीर केलेल्या २९,००० अतिरिक्त पदांपैकी (भूसंपादन कक्षातील पदांसह) महसूल व वन विभागाने अतिरिक्त म्हणून जाहीर केलेली पदे रद्द करण्याबाबतचे आदेश काढलेले आहेत.

२) अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या पदांवरील अधिकारी/कर्मचारी यांना विभागामार्फत रिक्त पदावर सामावून घेण्यात आले आहे अथवा वित्त विभागाकडील अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे वर्ग करण्यात आले आहे.

३) अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या पदांवरील कर्मचा-यांचे वेतन व भत्ते यांचे प्रदान कोणत्याही परिस्थितीत विभागातील कायम / स्थायी, अस्थायी पदांसाठीच्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून करण्यात येत नाही.

४) मुदतवाढ प्रस्तावित करण्यात आलेल्या पदांपैकी कार्यालय प्रमुखाच्या पदाव्यतिरिक्त इतर कोणतेही पद ६ महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त नाही अथवा अतिरिक्त कार्यभाराने चालू नाही.

५) सदर अस्थायी पदांच्या वेतनाचा खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

६) सदर पदांचा अस्थायी पदांच्या आढाव्यामध्ये समावेश आहे.

नगररचनाकारांच्या पथकामधील पदांची माहिती पुढीलप्रमाणे आहे -

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | नगर रचनाकार वर्ग-१ | ५६,१००-१७७५०० | १ |
| २ | रचना सहाय्यक | ३८६००-१२२८०० | १ |
| ३ | लिपिक-टंकलेखक | १९९००-६३२०० | १ |
| | | **एकूण पदे** | **३** |

**३.** उपरोक्त सर्व पदे संबंधित विभागाच्या स्थायी संवर्गातील तात्पुरती अतिरिक्त भर म्हणून समजण्यात यावी.

**४.** सदरहू पदांवरील पदधारक शासनाच्या वेळोवेळी निघालेल्या आदेशांप्रमाणे वेतन, महागाई भत्ता व पूरक भत्ते मिळण्यास पात्र राहतील.

**५.** सदर पदांवर व त्या पदांना देण्यात येणाऱ्या सोयी-सुविधांवर सन २०२४-२०२५ या वर्षात होणारा खर्च मागणी क्रमांक-सी-१-२०२९-जमीन महसूल ००१ संचालन व प्रशासन ००१ (०१) भूसंपादन आस्थापना (योजनेतर), ००१(०१)(०१) आयुक्त, कोकण वेतने (२०२९००४६०१)(०१)(०२) आयुक्त, नाशिक वेतने (२०२९००६४०१) (०१)(०३) आयुक्त, पुणे वेतने (२०२९००८२०१)(०१)(०४) आयुक्त, अमरावती वेतने (२०२९०१०८०१)(०१)(०५) आयुक्त, नागपूर वेतने (२०२९०१२६०१)(०१)(०६) आयुक्त, औरंगाबाद वेतने (२०२९०१४४०१)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून तो २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,

दि.२१.०२.२०२४ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

संबंधित विभागीय आयुक्त यांनी त्यांच्या आस्थापनेवरील व नियंत्रणाखालील कार्यालयांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घ्यावा. पदांचा आढावा घेताना शासनाच्या कार्यपद्धतीतील तंत्रज्ञानाचा वाढता वापर, काळानुरुप शासनाच्या मनुष्यबळात बदल व मनुष्यबळाच्या परिणामकारक वापराची आवश्यकता या बाबींचा विचार करून अनावश्यक पदे कमी करण्याचाही विचार करावा. दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ या कालावधीमध्ये आढाव्यास (नव्याने निर्माण केलेल्या पदांसह) उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेऊन सुधारित आकृतिबंध निश्चित करणे आवश्यक आहे. त्यामुळे, त्याबाबतचे प्रस्ताव विहित कालावधीत शासनास सादर करण्याची कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२४०५०८१४५९०६४२१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MOHASIN
RAJMAHMAD SHAIKH

Digitally signed by MOHASIN RAJMAHMAD SHAIKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=613d5f4e81161c3485310241b06dd6ce7372ad8baf95f5ae576d53ac61afe62b, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=74CDE6704F3FD0A42314F2424B55F3CFA18AE8A657DC2FC61B51901A90B029D5, cn=MOHASIN RAJMAHMAD SHAIKH
Date: 2024.05.08 15:11:43 +05'30'

**(मोहसिन रा. शेख)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सोबत: परिशिष्ट "अ"**

**प्रत,**

१) सर्व विभागीय आयुक्त
२) सर्व जिल्हाधिकारी
३) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
४) महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५) महालेखापाल-२, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६) संचालक, नगररचना व मूल्यनिर्धारण, पुणे
७) सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, पाचवा मजला, नवीन प्रशासन भवन,मुंबई
८) जिल्हा अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, ठाणे, रायगड, छत्रपती संभाजीनगर, नांदेड, लातूर, अमरावती, अकोला, नागपूर, नाशिक, धुळे, सातारा, कोल्हापूर यांचे कार्यालय
९) कार्यासन अधिकारी, अर्थसंकल्प ४/१९, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) कार्यासन अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
११) कार्यासन अधिकारी, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) कार्यासन अधिकारी, ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) अ-१, अ-३ व अ-४ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) निवडनस्ती (अ-२).

**शासन निर्णय क्र. अपमु-२०२३/प्र.क्र.२५०/अ-२, दि.०८.०५.२०२४**

**परिशिष्ट "अ"**

**१४ पथकांचे वाटप**

| | | |
|---|---|---|
| १) | मुंबई शहर व मुंबई उपनगर | संचालक, नगररचना, उपसंचालक, नगररचना मूल्यांकन तज्ञ म्हणून उच्च न्यायालयात काम पाहताना त्यांना सहाय्य करण्यासाठी- १ पथक (रिक्त असलेले रचना सहायकाचे पद वगळून). |
| २) | ठाणे व पालघर | १ पथक (रिक्त असलेले कनिष्ठ लिपिकाचे वगळून). |
| ३) | रायगड, रत्नागिरी व सिंधुदूर्ग | १ पथक (रचना सहायकाचे पद वगळून उर्वरित नगररचनाकार वर्ग १ व लिपिक पदास मुदतवाढ). |
| ४) | सातारा व सोलापूर | १ पथक सध्या नगर रचनाकार (वर्ग-१) पद पुणे जिल्हा सरकारी वकील यांच्याकडे दिले आहे. |
| ५) | सांगली व कोल्हापूर | १ पथक |
| ६) | अहमदनगर व नाशिक | १ पथक |
| ७) | जळगांव, धुळे व नंदूरबार | १ पथक |
| ८) | छत्रपती संभाजीनगर, जालना व बीड | १ पथक |
| ९) | लातूर व धाराशिव | १ पथक |
| १०) | नांदेड, परभणी व हिंगोली | १ पथक |
| ११) | अमरावती व यवतमाळ | १ पथक (रिक्त असलेले कनिष्ठ लिपिकाचे १ पद वगळून उर्वरित पदांना मुदतवाढ) |
| १२) | अकोला, वाशिम व बुलढाणा | १ पथक |
| १३) | वर्धा व नागपूर | १ पथक |
| १४) | चंद्रपूर, गडचिरोली, भंडारा व गोंदिया | १ पथक |
| | **एकूण :** | **१४ पथकांमध्ये ३८ पदे.** |

MOHASIN
RAJMAHMAD SHAIKH

Digitally signed by MOHASIN RAJMAHMAD SHAIKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=613d5f4e81161c3485310241b06dd6ce7372ad8baf95f5ae576d53ac61afe62b, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=74CDE6704F3FD0A42314F2424B55F3CFA18AE8A657DC2FC61B51901A90B029D5, cn=MOHASIN RAJMAHMAD SHAIKH
Date: 2024.05.08 15:12:04 +05'30'

**(मोहसिन रा. शेख)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**